शेतीच्या उपयोगाकरिता असलेल्या ट्रेलर्सवर
एक रकमी कर आकारणी बाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक-एमटीए १०२००/प्र.क्र.१२/परि-३,
मंत्रालय, मुंबई-३२, दिनांक २० डिसेंबर २००३

<u>शासन निर्णय -</u> दिनांक १.४.२००० पूर्वी नोंदणी झालेल्या हलक्या मालवाहू वाहनांना दिनांक ३०.५.२००१ पासून एक रकमी कराची पध्दत लागू केलेली आहे. तसेच दिनांक १.४.२००० नंतर नव्याने नोंदणी झालेल्या हलक्या मालवाहू वाहनांना दिनांक १.५.२००० पासून एक रकमी कराची पध्दत लागू केलेली आहे. ७५०० कि.ग्रॅ. पर्यंत वजन असलेली वाहने हलकी मालवाहू वाहने समजली जातात. ४५०० किलोग्रॅमपेक्षा अधिक वजन असलेल्या शेतीच्या उपयोगाकरिता असलेल्या ट्रेलर्सवर दिनांक १.४.२००१ पासून मोटार वाहन कर लागू करण्यात आलेला आहे. हलक्या मालवाहू वाहनांना एक रकमी कराची पध्दत लागू करण्यात आलेली असल्यामुळे शेतीचे जे ट्रेलर्स हलक्या मालवाहू वाहनात मोडतात त्यांना एकरकमी कर भरणे आवश्यक आहे. आर्थिक अडचणीमुळे शेतीच्या ट्रेलर्सचा एक रकमी कर भरता येणार नाही. त्याकरिता समान हप्ते बांधून देण्यात यावे अशा प्रकारच्या विनंत्या शेतकरी संघटनाकडून शासनाकडे प्राप्त झाल्या होत्या.

सदर विनंतीचा विचार करुन शासनाने असा निर्णय घेतला आहे की, शेतीच्या उपयोगाकरिता वापरण्यात येणा-या ट्रेलर्सचा ज्यांना एकरकमी कर भरणे शक्य आहे त्यांनी एकरकमी कर भरावा. परंतु ज्यांना एक रकमी कर भरण्यासाठी सवलत पाहिजे त्यांना समान हप्त्यात कर भरण्यासाठी खालीलप्रमाणे कालावधी देण्यात यावा.

दिनांक ३१.१२.२००३ पर्यंत २५%
दिनांक ३१.३.२००४ पर्यंत २५%
दिनांक ३०.६.२००४ पर्यंत २५%
दिनांक ३०.९.२००४ पर्यंत २५ %

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स.श्र. इनामदार)
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व प्रादेशिक/उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
निवडनस्ती.

D/SUDHA/TRA-3 G.R.